बाहययंत्रणेद्वारे (आऊटसोर्सिंग) सुरक्षा रक्षक सेवा घेण्यास मान्यता मिळणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः -प्रशामा २०२३/ प्र.क्र.२६४/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई.
दिनांक : ०९ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ**- सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) यांचे पत्र क्र.ससंआसे/ कुष्ठवक्षय/कक्षभांडार/सुरक्षा रक्षक/१५६४-६५/२४, दिनांक १८/०१/२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील क्षयरोग रुग्णालयांत बाहय यंत्रणेव्दारे तीन वर्षांसाठी सुरक्षा रक्षक नियुक्ती करणेसाठी येणा-या खर्चास प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्याबाबत सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठरोग व क्षयरोग) यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील शशीकला क्षयरोग आरोग्य धाम, कोल्हापूर, शासकीय गो.ग.राठी क्षय रुग्णालय, अमरावती, व पुणे उरो रुग्णालय, औंध, पुणे या रुग्णालयांसाठी बाहययंत्रणेद्वारे (आऊटसोर्सिंग) सुरक्षा रक्षक सेवा पुढील तीन वर्षाकरिता उपलब्ध करुन घेण्यासाठी येणा-या एकुण वार्षिक रुपये ३६,४८,०००/- (रु. छत्तीस लाख अठठेचाळीस हजार फक्त) इतक्या खर्चास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | आवश्यक सुरक्षा रक्षकांची संख्या | प्रति सुरक्षा रक्षक मासिक खर्च (रुपये) | वार्षिक खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|
| | शशीकला क्षयरोग आरोग्य धाम, जयसिंगपूर, कोल्हापूर | ७ | १६०००/- | १३,४४,०००/- |
| | शासकीय गो.ग.राठी क्षय रुग्णालय, अमरावती | ४ | १६०००/- | ७,६८,०००/- |
| | पुणे उरो रुग्णालयपुणे ,औंध , | ८ | १६०००/- | १५,३६,०००/- |
| | | | **एकुण** | **३६,४८,०००/-** |

१) बाहययंत्रणेद्वारे काम करुन घेताना शासन निर्णय क्र. शासन निर्णय ,उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.एमजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८.११.२००६ मधील तरतुदीनुसार पूर्तता करण्यात यावी.

२) केंद्र/ राज्य शासनाने मान्यता दिलेल्या सुरक्षा मंडळ अथवा मेस्को यांचेकडून सुरक्षा रक्षक घेण्यास प्रथम प्राधान्य द्यावे. त्यांचेकडून सुरक्षा रक्षक सेवा उपलब्ध न झाल्यास विहीत पध्दतीने ई- निविदा प्रक्रीया पार पाडून अत्यंत पारदर्शक पध्दतीने बाहययंत्रणेची निवड करण्यात यावी.

३) सुरक्षा रक्षकांचे वेतन त्यांच्या बँक खात्यात जमा झाल्याची खात्री केल्याशिवाय पुढील महिन्याचे देयक अदा केले जाणार नाही अशी अट Tender document मध्ये समाविष्ट करण्यात यावी.

४) निविदा प्रक्रिया जेमस् पोर्टलवरुन/खुल्या निविदा पध्दतीने करावी. खरेदी प्रक्रिया राबवितांना वित्तीय अधिकारांचे तसेच उद्योग ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भाखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मधील तरतूदींचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५) सेवा कराराची मुदत एक वर्षापुरती निश्चित करण्यात यावी व आवश्यकतेनुसार पुढे दोन वर्षे मुदतवाढ घेण्यात यावी.

६) याप्रमाणे सुरक्षारक्षकांची बाहययंत्रणेद्वारे नियुक्ती करताना कामगार कायद्यातील तरतुदीचे तसेच मा.न्यायालयाच्या आदेशांचे उल्लंघन होणार नाही व शासनाच्या प्रचलित धोरणांशी करारनाम्यातील तरतुदी सुसंगत असतील याची सहसंचालक (प्रा.आ.केंद्र) यांनी खात्री करावी.

७) रुग्णालयासाठी मान्य केलेल्या सुरक्षा रक्षकांची, संख्या ही कमाल मर्यादा असून स्थानिक गरजेनुसार त्यांची संख्या संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी यांनी मंजूर करुन द्यावी.

८) खर्च मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीमधून करण्यात यावा.

९) खर्च विहीत पध्दतीने करावा. प्रत्यक्ष कार्यादेश काढण्यापूर्वी तरतूद उपलब्ध असल्याची खात्री करावी.

१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसू-१, दि.२/२/२०१३, क्र.पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/विसू-१, दि.२/१२/२०१३ व दि.१९/१२/२०१३ मधील तसेच, या आदेशात वेळोवेळी केलेल्या सुधारणा/तरतुदींचे पालन करणे आवश्यक राहील.

०२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये, वित्तिय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग - पहिला, उपविभाग-चार मधील अ.क्र.१ अनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

०३. वरीलप्रमाणे सुरक्षा सेवा उपलब्ध करुन घेण्यासाठी येणारा खर्च मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशीर्ष २२१० वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य, ०६ सार्वजनिक आरोग्य, १०१, रोग प्रतिकारक व रोग नियंत्रण- (०४) इतर रुग्णालये व दवाखाने-(०४) (०१) क्षयरोग रुग्णालये व आरोग्य धामे, सांकेताक क्रमांक २२१० ०१९१, बाब-(१०) कंत्राटी सेवा. या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१७१०१२१८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2024.08.09 16:25:27 +05'30'

**( कविता पिसे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
४. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
६. सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळे. कोल्हापूर, अकोला, पुणे
७. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, अमरावती, पुणे
८. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर, अमरावती, पुणे
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, कोल्हापूर, अमरावती, पुणे
१०.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).